**वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखाली २० अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२१/प्र.क्र.२५०/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १३ सप्टेंबर, २०२१.

**पहा :-**

१) महसूल व वन विभागाचे शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९.
२) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १५.०२.२०२१.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.२०/२०-२१/१८६; दिनांक १५.०२.२०२१.
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १६.०३.२०२१.
५) वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०.०८.२०२१.

**शासन निर्णय :**

वनक्षेत्राचे सर्वेक्षण, सिमांकन व जमाबंदी या योजनेत्तर योजनेखालील २० अस्थायी पदांना दिनांक २८.२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याची प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये विनंती केली आहे.

**२.** उपरोक्त प्रस्तावानुषंगाने तसेच वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन, सदर २० अस्थायी पदांना या विभागाच्या समक्रमांक दिनांक १६.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक १.०३.२०२१ ते दिनांक ३१.०८.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

**३.** वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयानुसार सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. यास्तव खालील विवरणपत्र अ मध्ये दर्शविलेल्या २० अस्थायी पदे **दिनांक १.०९.२०२१ ते दिनांक २८.०२.२०२२ पर्यंत** चालू ठेवण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मंजूरी देण्यात येत आहे :-

**विवरणपत्र अ**

| अ.क्र. | पदनाम | पद संख्या | पदांचा वृत्तनिहाय तपशील |
|---|---|---|---|
| १ | वनजमाबंदी अधिकारी | ४ | (पुणे-१ /औरंगाबाद-१ / ठाणे-१/ नागपूर-१) |
| २ | वनपाल | १ | (ठाणे-१) |
| ३ | मंडळ अधिकारी | १ | (पुणे-१) |
| ४ | लेखापाल | १ | (पुणे-१) |
| ५ | वनसर्व्हेक्षक | ५ | (पुणे-१/ठाणे-३/औरंगाबाद-१) |
| ६ | वनक्षेत्रसर्व्हेक्षक | १ | (पुणे-१) |
| ७ | चेनमन | २ | (ठाणे-२) |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | चपराशी/ शिपाई | २ | (पुणे-१ / प.मुंबई (वन्यजीव)-१) |
| ९ | जीपचालक | २ | (पुणे-१) / (नागपूर-१) |
| १० | पहारेकरी | १ | (नागपूर-१) |
| एकूण | | **२० पदे** | |

अ) सदर २० अस्थायी पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाहीत.

ब) सदर २० अस्थायी पदे भूमी अभिलेख कार्यालयातील असून ती वन विभागातील पदांच्या आढाव्याअंती संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्य केलेल्या आकृतीबंधातील पदांमध्ये समाविष्ट असणे आवश्यक आहे.

४. या पदावर होणारा खर्च प्रधान शिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती (०१) (०२) वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) या लेखाशिर्षा खाली सन २०२१-२२ या वित्तीय वर्षातील मंजूर होणाऱ्या अनूदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०.०८.२०२१ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९१३१२५६५२५३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2021.09.13 12:58:27 +05'30'

**( अरविंद आपटे )**
**मुख्य वनसंरक्षक ( मंत्रालय)**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. सर्व विभागीय आयुक्त.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक, ठाणे/ पुणे/ नागपूर/औरंगाबाद.
६. वनजमाबंदी अधिकारी, भोर /औरंगाबाद/कोंकण, नागपूर.
७. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) / (लेख व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. नियोजन विभाग, (योजना-१४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. वित्त विभाग, व्यय-१०, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. निवडनस्ती, फ-३ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.